दिव्यांग कल्याण विभाग तसेच क्षेत्रिय कार्यालयांच्या संगणकीकरणासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२३/प्र.क्र.४८/दि.क.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२३.

**वाचा :**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : सीओएल-१००१ / प्र. क्र. १७४ / ०१ / ३९, दिनांक २९ ऑक्टोबर, २००१,
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : मातंसं / नस्ती २०१० / प्र. क्र. ३४ / ३९, दिनांक १८ जून, २०१०,
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : मातंस-२०११ / प्र. क्र. १२५ / ३९, दिनांक २३ सप्टेंबर, २०११,
४) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : शाकानि-२०२२ / प्र. क्र. ६७ / १८ (र.वका.), दिनांक १५ डिसेंबर, २०२२,
५) शासन निर्णय, दिव्यांग कल्याण विभाग, क्रमांक : दिव्यांग-२०२२ / प्र. क्र. १४८ / दि.क. २, दिनांक ४ जानेवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

राज्याचे प्रशासन अधिक गतीमान तसेच लोकाभिमुख करण्याच्या दृष्टीने माहिती तंत्रज्ञानाचा सुयोग्य वापर व्हावा, यासाठी प्रशासकीय कामकाजाचे संगणकीकरण करण्याच्या अनुषंगाने संगणकीकरणाचे प्रकल्प राबविण्यासाठी संबंधित विभागाने प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्याचे निर्देश सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २९ ऑक्टोबर, २००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ७.१ अन्वये देण्यात आलेले आहेत. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५ डिसेंबर, २०२२ च्या शासन अधिसूचनेन्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील दिव्यांग कल्याण-१ व दिव्यांग कल्याण-२ ही कार्यासने वेगळी करून मंत्रालयीन स्तरावर स्वतंत्र "**दिव्यांग कल्याण विभाग**" निर्माण करण्यात आला आहे. सबब दिव्यांग कल्याण विभाग तसेच विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालयांच्या संगणकीकरणासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्याची बाब विभागाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिव्यांग कल्याण विभाग तसेच विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालयांच्या संगणकीकरण ई-प्रशासन प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम | समितीवरील पद |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, दिव्यांग कल्याण विभाग | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग अथवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, नियोजन विभाग अथवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, माहिती तंत्रज्ञान अथवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५. | आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ६. | सह / उपसचिव (संगणक) | सदस्य सचिव |

२. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकांसाठी उपरोक्त सदस्यांशिवाय विभागातील / विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यालयांतील / अन्य विभागातील अधिकारी / विशिष्ट क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती यांना आवश्यकतेनुसार समिती निमंत्रित करू शकेल.

३. **समितीची कार्यकक्षा व अधिकार पुढीलप्रमाणे राहतील :-**

अ) माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या ई-गव्हर्नन्स धोरणाशी सुसंगत धोरण ठरविणे.

आ) दिव्यांग कल्याण विभाग, सर्व क्षेत्रिय कार्यालय, दिव्यांग वित्त व विकास महामंडळ यांच्यामार्फत राबविण्यात येणाऱ्या सर्व ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची व्याप्ती ठरविणे व विभागासाठी ई-प्रशासन प्रकल्प सुरु करण्यासाठी आरएफपी (Request for Proposal) अंतिम करून निविदा प्रक्रीयेत मार्गदर्शन करणे.

इ) दिव्यांग कल्याण विभाग व विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालये, दिव्यांग वित्त व विकास महामंडळ यांचे कामकाज ऑनलाईन करण्यासंदर्भात अंतिम निर्णय घेणे.

ई) ई-प्रशासन धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक ते हार्डवेअर / सॉफ्टवेअर इ. आवश्यक यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी तसेच संगणक प्रणालीचे विकसन करण्याबाबत निर्णय घेणे.

उ) विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध संगणकीकरण प्रकल्पांकरीता आवश्यकतेनुसार नामिकाप्रविष्ट संस्थांमधून सल्लागारांची निवड करणे व प्रकल्प प्रस्तावास विहित कार्यपद्धतीने मंजूरी देणे.

ऊ) ई-प्रशासन प्रकल्पांबाबत सल्ला, समन्वय व संनियंत्रण करणे व आढावा घेणे.

ऋ) रुपये ५ कोटीच्या वरील संगणकीकरण / माहिती तंत्रज्ञान विषयक प्रकल्प / संगणक सामग्री खरेदीच्या प्रस्तावास मान्यता देण्यासाठी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील गठीत उच्चाधिकार समितीस शिफारस करणे.

ऌ) माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी घेतलेल्या निर्णयांनुसार तसेच प्रदान केलेल्या अधिकारानुसार प्रकल्प अंमलबजावणी समितीस अधिकार राहतील.

४. प्रकल्प अंमलबजावणी समितीद्वारे मंजूर झालेल्या प्रकल्पांस प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-१०१३ / प्र. क्र. ३० / २०१३ /विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ च्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र. ४, परिच्छेद क्र. २७ (२) अनुसार प्रशासकीय विभाग म्हणून दिव्यांग कल्याण विभागास राहतील.

५. अशा प्रकारे मान्यता दिलेल्या रुपये ५ कोटींच्या मर्यादेतील प्रकल्पांना पुन्हा नव्याने वित्त विभाग / नियोजन विभाग / माहिती तंत्रज्ञान उपविभाग यांच्या मान्यतेची आवश्यकता असणार नाही. तथापि, कोणताही प्रकल्प राबविण्याबाबत एकवाक्यता झाली नसल्यास असा प्रकल्प उच्चाधिकार समितीसमोर मान्यतेकरीता सादर करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३२९१५०९१००५३५ असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by RAJESH BHASKAR GAIKWAD
Date: 2023.03.29 15:15:27 +05'30'

**( रा. भा. गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई,
८) सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

१०) व्यवस्थापकीय संचालक, दिव्यांग वित्त व विकास महामंडळ, महाराष्ट्र राज्य,
११) सह / उपसचिव, (अर्थसंकल्प) / व्यय-१४ / कोषा प्र. ५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) निवड नस्ती.